भाषा संचालनालयाच्या आस्थापनेवरील भाषा अधिकारी (हिंदी) गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांची दिनांक ०१.०१.२०११ ते दिनांक ०१.०१.२०२३ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः भाज्येसू-२०२२/प्र.क्र.९२/आस्था-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२३

वाचा -

१) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/१२, दि.२१.०६.२०२१.
२) भाषा संचालनालयाचे पत्र क्र.ज्येसूची २०२२/प्र.क्र.२०६/१६१८/चौदा, दि.२८.१२.२०२२

**शासन परिपत्रक -**

मराठी भाषा विभागाची स्थापना दिनांक २२.०७.२०१० पासून करण्यात आली. विभागाच्या निर्मितीनंतर विभागाच्या अधिनस्त असलेल्या भाषा संचालनालयाच्या आस्थापनेवरील भाषा अधिकारी (हिंदी),गट ब (राजपत्रित), या एकाकी संवर्गामधील अधिकाऱ्यांची ज्येष्ठता सूची नव्याने प्रसिध्द करावयाची आहे. शासन सेवेतील अधिकाऱ्यांची/कर्मचाऱ्यांची ज्येष्ठता सूची तयार करणे, प्रसिध्द करणे याबाबतचे सर्वंकष धोरण संदर्भ क्र.१ येथील अधिसुचनेद्वारे विहित करण्यात आले आहे. याअनुषंगाने संदर्भ क्र.२ अन्वये भाषा संचालनालयाकडून उपलब्ध झालेल्या व कार्यासनातील उपलब्ध अभिलेखानुसार भाषा अधिकारी (हिंदी),गट-ब (राजपत्रित) या संवर्गाची दिनांक ०१.०१.२०११ ते दिनांक ०१.०१.२०२३ या कालावधीची तात्पुरती ज्येष्ठतासूची या शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात येत आहे.

**२.** संचालनालयातील भाषा अधिकारी (हिंदी), गट-ब (राजपत्रित), या पदावर दिनांक ३१.५.२००८ पासून श्रीमती र.दि. भटनागर यांना तदर्थ पदोन्नती देण्यात आली. त्यानंतर श्रीमती भटनागर यांनी दिनांक २९.८.२०११ पासून स्वेच्छा सेवानिवृत्ती स्विकारली. श्रीमती भटनागर यांच्या सदर स्वेच्छा

सेवानिवृत्तीपासून म्हणजे दिनांक ३०.८.२०११ पासून दिनांक ३०.११.१४ या कालावधीपर्यंत सदर पदावर नियमित अधिकारी उपलब्ध नव्हता. सबब, सदर पदाच्या दिनांक १.१.२०१३ व दिनांक १.१.२०१४ या कालावधीच्या ज्येष्ठतासूच्या **"निरंक"** आहेत. तद्नंतर संचालनालयातील श्री. वि. ध. उंबरकर, पर्यवेक्षक (हिंदी) यांना भाषा अधिकारी (हिंदी) या पदावर दिनांक **१.१२.२०१४ पासून** तात्पुरती पदोन्नती देण्यात आली. श्री. उंबरकर हे दिनांक १.१२.२०१४ पासून आजतागायत संचालनालयात भाषा अधिकारी(हिंदी) पदावर कार्यरत आहेत.

३. उपरोक्त वस्तुस्थितीनुसार दिनांक ०१.०१.२०११ व दिनांक ०१.०१.२०१२ या कालावधीतील ज्येष्ठतासूच्या अनुक्रमे "प्रपत्र-अ" आणि "प्रपत्र-ब" मध्ये, दिनांक ०१.०१.२०१३ व दिनांक ०१.०१.२०१४ या कालावधीतील ज्येष्ठतासूची "प्रपत्र-क" मध्ये तसेच दिनांक ०१.०१.२०१५ ते दिनांक ०१.०१.२०२३ पर्यंतची ज्येष्ठतासूची "प्रपत्र-ड" मध्ये तयार करण्यात आल्या आहेत. संदर्भ क्र.१ येथील अधिसुचनेच्या अनुषंगाने दिनांक ०१.०१.२०१० ते दिनांक ०१.०१.२०२२ या कालावधीत संबंधित वर्षात नियमित/तदर्थ पदोन्नतीने/सरळसेवेने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांच्या नावांचा समावेश सदर ज्येष्ठता यादीमध्ये संबंधित वर्षात करण्यात आला आहे. दिनांक ३१.१२.२००९ पूर्वी सेवानिवृत्त, मयत झालेल्या अधिकाऱ्यांची नावे या ज्येष्ठतासूचीमधून वगळण्यात आली आहेत.

**४.** भाषा अधिकारी (हिंदी)गट-ब (राजपत्रित) या पदावरील अधिकाऱ्यांची सोबत जोडलेल्या ४ विवरणपत्रातील तात्पुरती ज्येष्ठतासूची खालील अटींच्या अधीन राहून प्रसिद्ध करण्यात येत आहे.

अ) ज्येष्ठतासूचीतील अधिकाऱ्यांच्या नावासमोर नमूद केलेला ज्येष्ठतेचा दिनांक हा म.ना.से.(ज्येष्ठता विनियमन) नियम, १९८२ मधील तरतूदी तसेच शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,दिनांक २१.०६.२०२१ नुसार फक्त भाषा अधिकारी (हिंदी) संवर्गातील ज्येष्ठता निश्चित करण्याकरिता विचारात घेण्यात येईल. सदर दिनांकाच्या अनुषंगाने आर्थिक लाभांची अनुज्ञेयता प्रचलित धोरणाच्या अधिन असेल.

ब) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दिनांक २५.५.२००४ चा शासन निर्णय रद्द करुन पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. सदर निर्णयास आव्हानित करण्यासाठी मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ दाखल करण्यात आली आहे. सदर विशेष अनुज्ञा याचिकेमधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदरची तात्पुरती ज्येष्ठतासूची निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक व त्यासोबतच्या ज्येष्ठतासूच्या संबंधित भाषा अधिकारी (हिंदी) यांच्या (रजेवर असलेल्या/सेवानिवृत्त झालेल्या अधिकाऱ्यांसह) तात्काळ निदर्शनास आणाव्यात. तसेच सदर ज्येष्ठतासूच्यांबाबत काही आक्षेप असतील तर त्याबाबत संबंधितांचे आक्षेप दिनांक १३.०४.२०२३ पर्यंत मागवून घेऊन ते भाषा संचालनालयाच्या स्तरावर तपासून संचालनालयाच्या अभिप्रायासह दिनांक २०.०४.२०२३ पर्यंत

शासनास पाठवावेत. सदर दिनांकानंतर शासनास प्राप्त झालेल्या आक्षेपांचा विचार केला जाणार नाही अशा सूचना संबंधितांना देण्यात याव्यात. दिनांक २०.०४.२०२३ पर्यंत कोणतेही आक्षेप शासनास प्राप्त न झाल्यास संबंधितांचे काहीही आक्षेप नाही असे गृहीत धरुन सदरची ज्येष्ठता सूची ही अंतिम स्वरुपात प्रसिद्ध करण्यात येईल याची कृपया नोंद घेण्यात यावी.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९१५५४१००८३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VAISHALI LAHU WAGHMARE

Digitally signed by VAISHALI LAHU WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a04bc63dad109dbcf1f43d6ad6a6b5f92b8f2c67d44331739500eba2bdfc622, pseudonym=E1BFA1A05AFD2F8E8BE45C3B7FCA1A87900F4192, serialNumber=F5570344940932 73E810D83B4B4760417E6293A17606F1295B2E68D6F099E122, cn=VAISHALI LAHU WAGHMARE
Date: 2023.03.29 17:48:35 +05'30'

**( वैशाली वाघमारे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संबंधित भाषा अधिकारी (हिंदी), (भाषा संचालनालयामार्फत)

२. भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, वांद्रे, मुंबई ४०० ०५१.

३. निवडनस्ती.

प्रपत्र "अ"

**शासन परिपत्रक क्रमांकः ज्येसूची-२०२२/प्र.क्र.९२/आस्था- २, दिनांक २९/०३/२०२३ चे सहपत्र**

| १ | संवर्गाचे नांव | भाषा अधिकारी (हिंदी),गट ब (राजपत्रित) | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | वेतनश्रेणी | एस- १५ : ४१८००-१३२३०० | | | | | | | |
| ३ | दि.१ जानेवारी,२०११ रोजीची एकत्रित तात्पुरती ज्येष्ठता सूची | | | | | | | | |
| | दि.१ जानेवारी,२०११ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता सूची (दि. १.१.२०१० ते दि.३१.१२.२०१० या कालावधीत कार्यरत कर्मचाऱ्यांची) | | | | | | | | |
| नियम३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नांव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्मदिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | प्रवर्ग | नियम ३ (२) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | शैक्षणिक अर्हता (ज्या पदासाठी आवश्यक आहे तेथेच हा रकाना भरावा | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | श्रीमती र.दि. भटनागर | तदर्थ पदोन्नती | ०२.०२.१९५८ | खुला | ३१.०५.२००८ | ३१.०५.२००८ | २९.०२.२०१६ | -- | भाषा संचालनालय आदेश क्र. रापअ (नियुक्ती) /२००९/१७८७/ १३८४/चौदा, दि. १७.८.२००९ नुसार सदर पदावर दि. ३१.५.२००८ पासून नियुक्ती. |

**प्रपत्र "ब"**

**शासन परिपत्रक क्रमांकः ज्येसूची-२०२२/प्र.क्र.९२/आस्था- २, दिनांक २९ /०३/२०२३ चे सहपत्र**

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | **संवर्गाचे नांव** | | **भाषा अधिकारी (हिंदी),गट ब (राजपत्रित)** | | | | | | |
| २ | वेतनश्रेणी | | एस- १५ : ४१८००-१३२३०० | | | | | | |
| ३ | **दि.१ जानेवारी,२०१२ रोजीची एकत्रित तात्पुरती ज्येष्ठता सूची** | | | | | | | | |
| | दि.१ जानेवारी,२०१२ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता सूची (दि. १.१.२०११ ते दि.३१.१२.२०११ या कालावधीत कार्यरत कर्मचाऱ्यांची) | | | | | | | | |
| नियम३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नांव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्मदिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | प्रवर्ग | नियम ३ (२) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | शैक्षणिक अर्हता (ज्या पदासाठी आवश्यक आहे तेथेच हा रकाना भरावा | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | श्रीमती र.दि. भटनागर | तदर्थ पदोन्नती | ०२.०२.१९५८ | खुला | ३१.०५.२००८ | ३१.०५.२००८ | २९.०२.२०१६ | -- | दि.२९.०८.२०११ पासून स्वेच्छा सेवानिवृत्ती. |

**प्रपत्र "क"**

**शासन परिपत्रक क्रमांकः ज्येसूची-२०२२/प्र.क्र.९२/आस्था- २, दिनांक २९/०३/२०२३ चे सहपत्र**

| १ | **संवर्गाचे नांव** | **भाषा अधिकारी (हिंदी),गट ब (राजपत्रित)** | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | वेतनश्रेणी | एस- १५ : ४१८००-१३२३०० | | | | | | | |
| ३ | **दि.१ जानेवारी,२०१३ ते दिनांक १ जानेवारी, २०१४ रोजीची एकत्रित तात्पुरती ज्येष्ठता सूची** | | | | | | | | |
| | (दि. १.१.२०१२ ते दि.३१.१२.२०१३ या कालावधीत कार्यरत कर्मचाऱ्यांची) | | | | | | | | |
| नियम३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नांव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्मदिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | प्रवर्ग | नियम ३ (२) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | शैक्षणिक अर्हता (ज्या पदासाठी आवश्यक आहे तेथेच हा रकाना भरावा | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| निरंक | | | | | | | | | |

**प्रपत्र "ड"**

**शासन परिपत्रक क्रमांकः ज्येसूची-२०२२/प्र.क्र.०९/आस्था- २, दिनांक २९/०३/२०२३ चे सहपत्र**

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | **संवर्गाचे नांव** | **सहायक भाषा संचालक (प्रशिक्षण व आस्थापना),गट ब (राजपत्रित)** | | | | | | | |
| २ | वेतनश्रेणी | एस- १५ : ४१८००-१३२३०० | | | | | | | |
| ३ | **दि.१ जानेवारी,२०१५ ते दि.१ जानेवारी,२०२३ रोजीची एकत्रित तात्पुरती ज्येष्ठता सूची** | | | | | | | | |
| | (दि. १.१.२०१४ ते दि.३१.१२.२०२२ या कालावधीत कार्यरत कर्मचाऱ्यांची) | | | | | | | | |
| नियम३ (२) (ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्याचे नांव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्मदिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | प्रवर्ग | नियम ३ (२) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | शैक्षणिक अर्हता (ज्या पदासाठी आवश्यक आहे तेथेच हा रकाना भरावा | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | श्री. वि. ध. उंबरकर | तात्पुरती पदोन्नती | १९.०६.१९६६ | खुला | ०१.१२.२०१४ | ०१.१२.२०१४ | ३०.०६.२०२४ | -- | मराठी भाषा विभाग कार्यालयीन आदेश क्र. भासंप-२०१४/प्र.क्र.१०९/२०१४/भाषा-१, दि.०१.१२.२०१४ नुसार तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती. |